**राज्यातील तालुका अधिकारी कार्यालयातील**
**१०५९ अस्थाई पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्र.जिरुप-१८१०/२१०/प्र.क्र.११३/आरोग्य-३
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २ फेब्रुवारी, २०११.

**वाचा :** १) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.पदआ-२००७/प्र.क्र.११७/सेवा-१, दि.६.१.२००७.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, समक्रमांक, दिनांक २०.१०.२०१०.

शासन निर्णय :

संदर्भाधीन अ.क्र. १ च्या शासन निर्णयानुसार सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखालील आरोग्य सेवा संचालनालय (मुख्यालय) मुंबई या कार्यालयाचा कार्यक्रम प्रमुख निहाय तसेच क्षेत्रिय कार्यालय निहाय पदांचा आढावा घेऊन मंजूर करण्यात आलेल्या सुधारित आकृतीबंधानुसार एकूण ८३०१७ पदांमध्ये तालुका आरोग्य अधिकारी कार्यालयाकरिता निश्चित केलेल्या १०५९ पदांचा समावेश करण्यात आला असून, एकूण ३५३ तालुक्यांच्या ठिकाणी प्रत्येकी एक वैद्यकीय अधिकारी, एक कनिष्ठ लिपिक व एक पुरुष परिचर अशी पदे पदनामामध्ये बदल करुन निर्माण करण्यात आलेल्या ३५३ तालुका आरोग्य अधिकारी कार्यालयात, प्रत्येकी ३ प्रमाणे अशी एकूण १०५९ पदे मंजूर करण्यात आली आहेत. २००९-२०१० पर्यंत सदर १०५९ अस्थाई पदे ज्या आस्थापनेवर कार्यरत होती त्या आस्थापनेवरच या पदांना मुदतवाढ देण्यात येऊन त्यांचे वेतन काढण्यात येत होते. तथापि, **या वर्षापासून या १०५९ अस्थायी पदांचे वेतन स्वतंत्ररित्या काढण्यात येत असल्याने** संदर्भाधीन अ.क्र. २ च्या शासन निर्णयान्वये सदर राज्यातील ३५३ तालुका आरोग्य अधिकारी कार्यालयातील १०५९ अस्थायी पदे दिनांक ३१.१२.२०१० पर्यंत चालू ठेवण्यात आली होती. **सदर पदांचे स्थायीकरण करण्याची कार्यवाही शासनस्तरावर सुरु आहे. ही कार्यवाही अद्याप पूर्ण झाली नसल्याने विचाराधीन** १०५९ अस्थायी पदे दिनांक १.१.२०११ ते २८.२.२०११ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. यावरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१०-२०११ या वर्षाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक - आर - १**

" २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य.
०१० - किमान गरजा कार्यक्रम,पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना
(०१)(०२) - प्राथमिक आरोग्य केंद्राचा ग्रामीण रुग्णालयांचा दर्जावाढ करणे. (२२१० ०५३१)"

३. हा निर्णय वित्त विभागाच्या क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ४ ऑक्टोबर २००४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४.   सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक- २०११०२०२१७४८२६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(सुहास रा. चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति ,
संचालक, आरोग्य सेवा,मुंबई.
सहसंचालक, आरोग्य सेवा (प्राआके जिल्हास्तर) मुंबई /
सहसंचालक, आरोग्य सेवा (आरोग्य) पुणे.
उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक/ नागपूर/ अमरावती/ मुंबई, ठाणे/ पुणे/ कोल्हापूर/ औरंगाबाद/ लातूर.
सर्व तालुका आरोग्य अधिकारी.
महालेखापाल,१/२, महाराष्ट्र (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक /जळगांव /धुळे /अहमदनगर /नंदूरबार/ नागपूर/ भंडारा/ चंद्रपूर/ वर्धा/ गडचिरोली/गोंदिया/ अकोला/ अमरावती/ बुलढाणा/ यवतमाळ/ वाशिम/ ठाणे/ रायगड/ रत्नागिरी/ पुणे/सोलापूर/ सातारा/ कोल्हापूर/ सांगली/ सिंधुदुर्ग/ औरंगाबाद/ जालना/ परभणी/ हिंगोली/ लातूर/उस्मानाबाद/ नांदेड/ बीड
वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव (आरोग्य-४) मंत्रालय, मुंबई
कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/सेवा-५, अर्थसंकल्प, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती (आरोग्य-३)